**राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान**
**राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची पुनर्रचना...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२५२४/प्र.क्र.३६/२०१५/(२)साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१५.

**वाचा :** १) शासन निर्णय शिक्षण व युवक सेवा विभाग क्रमांक-एलआयबी-२५७५/७९५६/(७०५)/तेरा, दिनांक २९.७.१९७७
२) शासन निर्णय क्रमांक- मराग्रं-२०१०/(२६८/१०)/साशि-५, दिनांक १३.९.२०११
३) ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३१/SLPC बैठक/२०१४-१५/ १५९७९ दिनांक २४.११.२०१४
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक -प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि. ३ मार्च, २०१०

**प्रस्तावना :**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कलकत्ता या संस्थेची स्थापना भारत सरकारच्या आर्थिक सहाय्याने १९७२ साली झाली. देशातील सार्वजनिक ग्रंथालय सेवेचा सार्वत्रिक विकास करणे, हे प्रतिष्ठानचे उद्दिष्ट आहे. राज्यांमध्ये व संघराज्यांमध्ये ग्रंथालय सेवा प्रभावीपणे राबवून ती वृद्धिंगत करण्यासाठी प्रतिष्ठान, राज्यांना ५०:५० या प्रमाणात अनुरुप अनुदान देते. प्रतिष्ठानच्या या योजना राबविण्यासाठी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "सर्वांसाठी पुस्तके" (Books for all) या पुस्तकामधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार शासन निर्णय दिनांक २९ जुलै, १९७७ अन्वये राज्य ग्रंथालय नियोजन समितीची स्थापना करण्यात आली. प्रतिष्ठानच्या **'ग्रंथ भेट'** या योजनेंतर्गत ग्रंथ खरेदी करुन, त्याचे वितरण निवडक सार्वजनिक ग्रंथालयांना करण्यात येते. मराठी भाषेत प्रतिवर्षी प्रकाशित झालेले सर्व ग्रंथ, राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या विचारार्थ ठेवण्यात येतात. या सर्व ग्रंथांतून निवडक ग्रंथांची निवड करण्याचे काम सुलभपणे पार पाडण्यासाठी, राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आली. त्यानुसार सदर समितीची मुदत दिनांक १२.९.२०१४ रोजी संपुष्टात आलेली आहे. त्यानुषंगाने राज्य ग्रंथालय समितीच्या उपसमितीची पुनर्रचना करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानअंतर्गत राज्य ग्रंथालय समितीच्या उपसमितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १. | ग्रंथालय संचालक | अध्यक्ष |
| २. | राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेली व्यक्ती | सदस्य |
| ३. | राज्य ग्रंथालय संघाचे अध्यक्ष किंवा कार्यवाह | सदस्य |
| ४. | उपसचिव (ग्रंथालये), उच्च व तंत्रशिक्षण विभाग | सदस्य |
| ५. | राज्य मध्यवर्ती ग्रंथालयाचा ग्रंथपाल | निमंत्रक |

२. सदर समितीची मुदत तीन वर्षांपुरती मर्यादीत राहील. ग्रंथालय संचालकांनी विहित पद्धतीनुसार ग्रंथ निवड करणे तसेच ग्रंथ व साहित्य खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव नियमानुसार तपासून या समितीस पुरेशा वेळेपूर्वी सादर करणे बंधनकारक राहील.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णय, दिनांक ३ मार्च, २०१० मधील नियमानुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही, संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल आणि याकरीता होणारा खर्च,

"मागणी क्र.डब्ल्यू-४,
२२०५ कला व संस्कृती,
१०५ सार्वजनिक ग्रंथालये,
(०१) ग्रंथालय संचालनालय,
(०१)(०१) ग्रंथालय संचालनालय,
योजनेतर खर्च (२२०५ ०२५१),
११ प्रवास खर्च",

या लेखाशिर्षातर्गत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३०१५३२४८२७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Vishnu Jadhav

Digitally signed by Rajendra Vishnu Jadhav
DN: CN = Rajendra Vishnu Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Higher & Technical Education
Date: 2015.03.30 15:42:59 +05'30'

**(राजेंद्र वि. जाधव)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३) मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण), यांचे खाजगी सचिव,
४) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्रशिक्षण), यांचे खाजगी सचिव,
५) ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) डॉ. आर.के. पाटील, ग्रंथपाल, (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
७) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१०) सचिव, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
११) ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१२) प्रधान सचिव(उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिद्धीसाठी)
१४) निवडनस्ती (साशि-५)